**पुणे जिल्हयातील जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांचे अधीनस्त महिला व बालकांच्या एकूण ७ शासकीय संस्थांसाठी दि. १.४.२०१५ ते दि. ४.८.२०१५ या कालावधीत केलेल्या अन्नधान्य व इतर नित्योपयोगी वस्तुच्या खरेदी खर्चास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन परिपत्रक क्र.बालगृ-२०१५ / प्र.क्र. ८८/का-८**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २६ जून, २०१८

**संदर्भ:** १.उद्योग,उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र भाखंस-१०८८/(२५१२)/उद्योग-६ दि.२.१.१९९२
२.समक्रमांकाचा शासन निर्णय दि. ३१.३.२०१५.
३.आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/मवि/आहार खर्च/का-६/२०१७-१८/१७०४ दि. १७.३.२०१८.

**प्रस्तावना :-**

१. महिला व बाल विकास विभागांतर्गतच्या पुणे जिल्ह्यातील शासकीय महिला राज्यगृह, मुंढवा या शासकीय संस्थांच्या दि.१.४.२०१५ ते दि. ४.८.२०१५ या कालावधीत केलेल्या अन्नधान्य व इतरसामुग्री पुरवठा देयकाच्या सन २०१२-१३ च्या मंजूर दराने केलेल्या खर्चास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत आयुक्तालयाच्या दि.१७.३.२०१८ च्या पत्रान्वये विनंती करण्यात आली आहे.

२. यापूर्वी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय दि. ३१.३.२०१५ अन्वये पुणे येथील महिला व बालकांच्या एकूण ७ शासकीय संस्थांच्या अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तू व नित्योपयोगी किरकोळ वस्तूंचा सन २०१२-१३ च्या मंजुरी दराने करण्यात आलेल्या पुरवठा खर्चास दि. ३१.३.२०१५ पर्यंतच्या मुदतवाढीस एकवेळची बाब म्हणून कार्योत्तर मंजूरी देण्यात आली आहे.

३. मात्र, विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, पुणे यांच्या दि. ५.८.२०१५ च्या पत्रान्वये पुणे येथील महिला व बालकाच्या एकूण ७ शासकीय संस्थांना अन्नधान्य किराणा, भाजीपाला,मटण, दुध व साधनसामुग्री यांचा पुरवठा करणेसाठी ई-निविदेस मंजूरी देण्यात आली. त्यामुळे दि. १.४.२०१५ ते दि. ४.८.२०१५ या कालावधीत कोणतेही पुरवठादर मंजूर नव्हते. मात्र दि. १.४.२०१५ ते दि.४.८.२०१५ या कालावधीत उक्त शासकीय संस्थांतील लाभार्थांची गैरसोय होऊ नये याकरिता त्यांना आवश्यक असणा-या अन्नधान्य किराणा, भाजीपाला,मटण, दुध व साधनसामुग्री यांचा पुरवठा जुन्या मंजूरी निविदाधारकाकडून सन २०१२-१३ च्या मंजूर दराने करण्यात आला आहे. मात्र सदर संस्थांनी केलेली खरेदी कोणत्याही पुरवठाधारकाचे दर मंजूर नसल्याने केली असल्याने, सदर देयकाकरिता प्रशासकीय विभागाची मंजुरी आवश्यक असल्याचे कोषागाराचे आक्षेप आहेत.

४. शासकीय संस्थांतील लाभार्थीचे गैरसोय टाळणे आवश्यक असल्याने अन्नधान्य आणि इतर नित्यपयोगी वस्तुखरेदी करणे अनिर्वाय असणे, खरेदीची कार्यवाही सन २०१५मध्ये झालेली असल्याने देयक देणे आवश्यक असणे याबाबी विचारात घेता, शासन निर्णय दि. ३१.३.२०१५ अन्वये दिलेली पुरवठा खर्चास देण्यात आलेली मान्यता दि.४.८.२०१५ पर्यंतच्या खरेदीपर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, पुणे यांच्या अधीनस्तच्या महिला व बालकांच्या एकूण ७ शासकीय संस्थेच्या दि.१.४.२०१५ ते दि. ४.८.२०१५ या कालावधीत करण्यात आलेल्या अन्नधान्य व इतर खाद्योपयोगी वस्तू व नित्योपयोगी किरकोळ वस्तूच्या सन २०१२-१३ च्या पुरवठा दराने करण्यात आलेल्या खरेदी खर्चास या शासन निर्णयाअन्वये एकवेळची बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे. सदरची देयके चालू आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावीत. संबंधित कालावधीतील देयके अदा करण्याच्या अनुषंगाने नियमानुसार आवश्यक कार्यवाही संबंधितांकडून करण्यात यावी. संबंधित संस्थांची नावे सोबतच्या परिशिष्टामध्ये जोडली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२६१७३२०७०३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2018.06.26 17:42:57 +05'30'

**(स्मिता निवतकर)**
उप सचिव ,महाराष्ट्र शासन

सोबत-परिशिष्ट

१) मा.राज्यपाल, यांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई .
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
४) मा.सभापती/उपसभापती विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ. मुंबई .
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद,महाराष्ट्र विधीमंडळ.
६) मा.मंत्री (म व बा वि)/ राज्यमंत्री(म व बा वि),यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय ,मुंबई .
७) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव,मंत्रालय,मुंबई
८) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) अपर मुख्य सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
१०) प्रधान सचिव (व्यय),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११) प्रधान सचिव (ले व को),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) आयुक्त , महिला व बाल विकास , महिला व बाल विकास आयुक्तालय,म.रा. पुणे.

१३) उप आयुक्त (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) कार्यक्रम व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य बाल संरक्षण सोसायटी, पुणे.
१५) सर्व उपसचिव ,सर्व अवर सचिव, महिला व बाल विकास. नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
१६) उपायुक्त (बालविकास) महिला व बाल विकास आयुक्तालय, म.रा.पुणे.
१७) वित्त विभाग (व्यय-६/अर्थसंकल्प-७), नियोजन विभाग (का-१४७२) मंत्रालय,मुंबई -३२,
१८)सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
१९) सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासकीय भवन , मुंबई
२०) निवड नस्ती का-८

शासन परिपत्रक क्र.बालगृ-२०१५ / प्र.क्र. ८८/का-८ दि. २६.६.२०१८ सोबतचे
परिशिष्ट

| अ.क्र | शासकीय संस्थेचे नाव |
|---|---|
| १ | पंडित जवाहरलाल नेहरू उद्योग केंद्र, येरवडा, पुणे-६, विशेष बालगृह, येरवडा, गोल्फ मैदानाजवळ, पुणे |
| २ | शासकीय मुलांचे वरिष्ठ बालगृह येरवडा, जेल रोड येरवडा, पुणे |
| ३ | शासकीय मुलींचे निरीक्षणगृह/विशेष बालगृह, मुंढवा, डायमंड वॉच कंपनी शेजारी,मुंढवा,पुणे |
| ४ | शासकीय मुलींचे कनिष्ट/वरिष्ठ बालगृह, शिरूर, ता. शिरूर , जि.पुणे |
| ५ | शासकीय महिला राज्यगृह मुंढवा, डायमंड वॉच कंपनी शेजारी,मुंढवा,पुणे |
| ६ | शासकीय महिला स्वीकार केंद्र, बारामती (प्रेरणा महिला वसतीगृह), होमगार्ड ऑफिसजवळ, तांदुळवाडी, ता. बारामती, पुणे. |
| ७ | शासकीय भिक्षेकरी स्वीकार केंद्र,फुलेनगर, आर.टी. ऑफिस जवळ, येरवडा ,पुणे-६ |